धार्मिक अल्पसंख्याक विद्यार्थी बहुल शासनमान्य खाजगी अनुदानित / विना अनुदानित / कायम विना अनुदानित शाळा, कनिष्ठ महाविद्यालये, औद्योगिक प्रशिक्षण संस्था,नगरपालिका / नगरपरिषद शाळा व अपंग शाळांमध्ये पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजनेंतर्गत अनुदान वितरण (सन २०२३-२४)
जि. बुलडाणा .

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०२३/प्र.क्र.१२८/का-६
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख:- ०५ मार्च, २०२४.

वाचा :

१) शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१५/प्र.क्र.८०/१५/का-६, दि.०७.१०.२०१५
२) शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०२२/प्र.क्र. ४०/भाग-१/का-६, दि. १३ जून, २०२३
३) जिल्हाधिकारी,जिल्हाधिकारी कार्यालय, बुलडाणा यांचे पत्र क्र. कावि/अ.का./अल्पसंख्याक कक्ष/३८७/२०२३, दि. २५.१०.२०२३ .

प्रस्तावना :-

धार्मिक अल्पसंख्याक विद्यार्थी बहुल शासनमान्य खाजगी अनुदानित / विनाअनुदानित शाळा, कनिष्ठ महाविद्यालये, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नगरपालिका / नगरपरिषद शाळा व अपंग शाळांमध्ये पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजना शासन निर्णय दिनांक ७ ऑक्टोंबर, २०१५ अन्वये राबविण्यात येत आहे. सदरहू योजनेंतर्गत संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडून शासनास प्राप्त झालेल्या प्रस्तावातील पात्र शाळांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता अनुदान मंजूर करण्यासाठी पुढीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | पात्र शाळांची संख्या | प्रस्तावित अनुदान (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|
| १. | अमरावती विभाग | बुलडाणा | २१ | ४२,००,०००/- |
| | | **एकूण** | **२१** | **४२,००,०००/-** |

**शासन निर्णय :-**

संबंधित जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय निवड समितीने उपरोक्त शासन निर्णय दि.७.१०.२०१५ मधील तदतुदीनुसार त्यांच्याकडे प्राप्त अर्जांची छाननी केली असून, छाननीअंती पात्र शाळांची यादी, शिफारशी व आवश्यक निधीच्या मागणीसह प्रस्ताव मंजूरीकरिता शासनाकडे पाठविला आहे. संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या सर्व प्रस्तावांची शासनस्तरावर छाननी करुन त्यामध्ये पात्र ठरलेल्या शाळांची संख्या व त्यांस मंजूर करावयाच्या **(कमाल मर्यादा प्रत्येक शाळेसाठी रू.२.०० लाख)** अनुदानाची रक्कम सोबतच्या तक्त्यात दर्शविण्यात आली आहे :-

उपरोक्त तक्यात दर्शविल्याप्रमाणे तसेच प्रस्तुत शासन निर्णयाच्या **"परिशिष्ट अ"** येथील यादीनुसारच्या एकूण **२१** शाळांना **रु. ४२,००,०००/- (रूपये बेचाळीस लाख, फक्त)** इतके अनुदान या योजनेंतर्गत मंजूर करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे. संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना सदर निधीसाठी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियत्रंण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. अनुदान मंजूर केलेल्या पात्र शाळांच्या नावासमोर त्या शाळेच्या मागणीचे स्वरुप, यापूर्वी अनुदानाचा लाभ घेतल्याचे वर्ष याचा तपशील या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रामध्ये दर्शविण्यात आला आहे. संबंधित जिल्हाधिकारी, यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेला उक्त निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीतून (BDS) आहरित करून संवितरित करण्यास खालील परिच्छेदातील बाबींच्या पूर्ततेच्या अधीन राहून वितरण करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय दि. ०७.१०.२०१५ मधील अटी व शर्तीनुसार फक्त एका DIES CODE / INSTITUTE CODE / लायसन्स क्रमांकासाठी अनुदान देण्यात येईल. तसेच, एकाच इमारतीत / आवारात एकाच संस्थेच्या प्राथमिक, माध्यमिक,उच्च माध्यमिक अशा वेगवेगळया शाळा / महाविद्यालये हे दिवसभरातील स्वतंत्र वेळापत्रकानुसार वेगवेगळया पाळीत / सत्रात भरत असतील आणि त्यांचे DIES CODE वेगवेगळे असतील अशा परिस्थितीत त्या इमारतीसाठी / आवारासाठी या DIES CODE पैकी फक्त एकाच DIES CODE साठी अनुदान मंजूर करण्यात येईल. तसेच अनुदान प्राप्त शाळा स्वयं अर्थसहाय्यीत नाहीत याबाबत संबंधित जिल्हाधिकारी यांनी अनुदान वितरण करण्यापूर्वी शासन निर्णय दि. ७.१०.२०१५ मध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन होईल याची दक्षता घ्यावी. या योजनेंतर्गत शाळांना चालू वर्षात ज्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी संबंधित शाळांनी निधी खर्ची टाकावा.

३. शाळा, महाविद्यालय, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, अपंग व नगरपालिका / नगरपरिषद शाळांना अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित शाळा, महाविद्यालय, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, अपंग व नगरपालिका / नगरपरिषद शाळांनी अनुदान प्रत्यक्ष प्राप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर अनुदानाच्या विनियोगाचे **"परिशिष्ट- क"** विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे सादर करणे बंधनकारक आहे. तसेच जिल्हाधिकारी यांनी या शासन निर्णयासोबतच्या **"परिशिष्ट- ब"** नुसार विहित नमुन्यात शासनास व महालेखापाल कार्यालयास उपयोगिता प्रमाणपत्रांचा अहवाल सादर करावा. तसेच त्यांनी नियंत्रण अधिकारी म्हणून शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.एयुडीः-१०८२ / दसीआर-९० /८४ / कोष-५, दि.२४ सप्टेंबर, १९८६ नुसार सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ घालून त्यासंबंधीचे प्रमाणपत्र व सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाचा संबंधीत लेखा शिर्षाचा विनियोजन लेखा अहवाल दि. ३० सप्टेंबर, २०२४ पर्यंत शासनास निश्चितपणे सादर करावा.

४. या योजनेंतर्गत उद्भवणाऱ्या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी शासन निर्णय दि.०७.१०.२०१५ मध्ये नमूद संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय निवड समितीस प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. या योजनेंतर्गत होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, प्रधान लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण २००, इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२१) अल्पसंख्यांक शाळांना पायाभूत

सुविधा पुरविणेकरिता सहायक अनुदान कार्यक्रम (२२३५ ए-३४७) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. या निधी वितरणासाठी वित्त विभाग शासन परिपत्रक, क्रमांक अर्थसं-२०२३ / प्र.क्र.४० / अर्थ-३, दि.१२/०४/२०२३ मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार सन २०२३-२४ च्या प्रथम नऊमाही करिता (डिसेंबर, २०२३ अखेरपर्यंत) अर्थसंकल्पीय **तरतुदीच्या ७०%** इतका निधी वित्त विभागाकडून बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन दिला जाणार आहे. त्यापैकी **२०%** म्हणजेच **रू. ४.०० कोटी** इतकी तरतूद बिम्स प्रणालीवर उपलब्ध करण्यात आली आहे. उपलब्ध निधीपैकी **रू. ३६.०० लाख इतकी रक्कम खर्च झाली असून उर्वरीत रू. ३.६४ कोटी इतका निधी शिल्लक आहे.** सदर शिल्लक रकमेमधून **उक्त रू. ४२,००,०००/-** इतका निधी चालू आर्थिक वर्षासाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार निधी वितरणाचा शासन आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०५१८२२५९१०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MEGHANA GAURAV SHINDE

Digitally signed by MEGHANA GAURAV SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d29224e30812c4523eedb32c54f5cbc27548f81ccf656192b6d735115af1dfb8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D625CF85C370BB4C35F332D5F951F0A9CD61FAD5DDF056809A969BFDD9FDB7DA, cn=MEGHANA GAURAV SHINDE
Date: 2024.03.06 16:50:19 +05'30'

**( मेघना गौरव शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री / मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव
४) सर्व मा. मंत्री / मा.राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६) मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१२) महालेखापा ½ (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलडाणा .

१४) जिल्हाधिकारी, बुलडाणा .

१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा.

१६) विभागीय शिक्षण उपसंचालक, बुलडाणा.

१७) जिल्हा नियोजन अधिकारी, बुलडाणा.

१८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलडाणा.

१९) अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२०) सर्व संबंधित शाळा (जिल्हाधिकाऱ्यांमार्फत)

२१) निवड नस्ती.

**शासन निर्णय क्रमांक:- अविवि-२०२३/ प्र.क्र.१२८/ का.६ दि. ०५ मार्च, २०२४ सोबतचे चे सहपत्र**

**"परिशिष्ट-अ"**

| अ.क्र. | संस्थेचे नाव व शाळेचे नाव | प्रयोजन | अनुदानाचे वर्ष |
|---|---|---|---|
| (१) | **अमरावती विभाग, जिल्हा- बुलडाणा .** | | |
| १. | नगर परिषद देऊळगांव राजा, जि. बुलडाणा द्वारे संचालित नगर परिषद उर्दु प्राथमिक शाळा देऊळगांव राजा, जि. बुलडाणा. | डेस्क बेंच खरेदी करणे.व छत दुरूस्ती करणे. | ५ |
| २. | नगर परिषद लोणार, जि. बुलडाणा द्वारे संचालित नगर परिषद मराठी प्राथमिक शाळा क्रमांक-१, लोणार, जि. बुलडाणा. | संगणक, टेबल व खुर्ची खरेदी करणे. | ३ |
| ३. | नगर परिषद चिखली, जि. बुलडाणा द्वारे संचालित नगर परिषद मराठी प्राथमिक शाळा क्रमांक-१, चिखली, जि. बुलडाणा. | छत दुरूस्ती करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा (कुलर/फिल्टर सह.) निर्माण करणे. | ४ |
| ४. | नगर परिषद चिखली, जि. बुलडाणा द्वारे संचालित स्व. गोंविदराव शेट्ये नगर परिषद मराठी प्राथमिक शाळा क्रमांक-२, चिखली, जि. बुलडाणा. | पिण्याच्या पाण्याची सुविधा निर्माण करणे व संगणक, प्रिंटर व इतर साधणे खरेदी करणे. | २ |
| ५. | नगर परिषद बुलढाणा, जि. बुलडाणा द्वारे संचालित डॉ. डी.सी.गुप्ता नगर परिषद शाळा क्रमांक-४, बुलडाणा, जि. बुलडाणा. | प्रिंटर, बॅटरी व इन्व्हर्टर खरेदी करणे. | २ |
| ६. | नगर परिषद मलकापूर, जि. बुलडाणा द्वारे संचालित म्युनिसीपल हायस्कुल, जि. बुलडाणा. | सी.सी.टी.व्ही., अध्यापनाची साधणे, एल.सी.डी. व एल.ई.डी. टी.व्ही. खरेदी करणे. | ३ |
| ७. | रफीक ए- मिल्लत एज्युकेशन ॲन्ड वेलफेअर असोसिएशन, नांदूरा, जि. बुलडाणा द्वारे संचालित माजिदिया उर्दु हायस्कुल, आठवडी बाजार, नांदूरा, जि. बुलडाणा. | प्रयोगशाळा उभारणे, अद्ययावत करणे, संगणक, बेंच / डेस्क, इन्व्हर्टर, बॅटरी, एल.ई.डी. टी.व्ही., झेरॉक्स मशिन व खेळ साहीत्य खरेदी करणे. | ५ |
| ८. | हजरत अमानतखान शहीद, शहीद (र.अ.) शिक्षण संस्था साखरखेर्डा, ता. सिंदखेड राजा, जि. बुलडाणा द्वारे संचालित उर्दु हायस्कुल, साखरखेर्डा, जि. बुलडाणा. | संगणक, प्रिंटर, UPS , झेरॉक्स मशिन खरेदी करणे. | २ |
| ९. | हाफीजा मुनाफ मायनॅरिटीज एज्युकेशन ॲन्ड मल्टीपर्पज सोसायटी, पिंपळगांव राजा,ता. खामगांव, जि. बुलडाणा द्वारे संचालित गुलशन ए हाफिजा उर्दु हायस्कुल, माधनी, ता. खामगांव, जि. बुलडाणा. | ग्रंथालयासाठी शैक्षणिक साहीत्य, किट्स, डेस्क बेंच, अध्यापनाची साधणे, एल.सी.डी. प्रोजेक्टर इत्यादी खरेदी करणे. | ३ |
| १०. | अलखिजर शैक्षणिक व बहुउद्देशिय संस्था, सुलतानपुरा, जळगांव जामोद, जि. बुलडाणा द्वारे संचालित न्यू. उर्दु हायस्कुल, रसूलपुर रोड, खेळखासा बु. जळगाव जामोद, जि. बुलडाणा. | संगणक, प्रिंटर खरेदी करणे. | २ |
| ११. | समता बहुउद्देशिय शिक्षण, कृषी प्रसारक संस्था, खापरखेड (घुले), ता. लोणार, जि. बुलडाणा द्वारे | इन्व्हर्टर खरेदी करणे. | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| | संचालित कै. हर्षाबाई सदावर्ते कन्या शाळा, कोयाळी, (दहासोंडे) , ता. लोणार, जि. बुलडाणा. | | |
| १२. | श्री.जैन महिला मंडळ, मलकापूर, जि. बुलडाणा द्वारे संचालित भगवान महावीर निवासी मुकबधिर विद्यालय, महाविर भवन कॉम्प्लेक्स, मलकापूर, जि. बुलडाणा. | सोलर पॅनल खरेदी करणे. | ३ |
| १३. | राजा एज्युकेशन सोसायटी, पिंपळगांव राजा, जि. बुलडाणा द्वारे संचालित उर्दु प्रायमरी स्कुल, पिंपळगांव राजा, जि. बुलडाणा. | शाळा- खोल्यामध्ये फरशी बसविणे. | ३ |
| १४. | नगर परिषद खामगांव, जि. बुलडाणा द्वारे संचालित छत्रपती शाहू महाराज नगर परिषद मराठी प्राथमिक शाळा क्रमांक-१०, खामगांव, जि. बुलडाणा. | पिण्याच्या पाण्याची सुविधा निर्माण करणे (कुलर / फिल्टर सह), एल.ई.डी. टी. व्ही. खरेदी करणे. | २ |
| १५. | नगर परिषद खामगांव, जि. बुलडाणा द्वारे संचालित भारतरत्न राजीव गांधी नगर परिषद हिंदी प्राथमिक शाळा क्रमांक- २, खामगांव, जि. बुलडाणा. | वॉटर कुलर, बोर्ड, एल.ई.डी. व डेस्क बेंच खरेदी करणे. | १ |
| १६. | नगर परिषद बुलडाणा, जि. बुलडाणा द्वारे संचालित हाजी सै. उस्मान सै. मन्नु डोंगरे नगर परिषद उर्दु प्राथमिक शाळा क्रमांक- २, बुलडाणा, जि. बुलडाणा. | छत दुरूस्ती, Water Proofing Of Terace. इ. | ५ |
| १७. | नगर परिषद नांदूरा, जि. बुलडाणा द्वारे संचालित नगर परिषद उर्दु प्राथमिक कन्या शाळा, नांदूरा, जि. बुलडाणा. | डेस्क बेंच खरेदी करणे. | १ |
| १८. | नगर परिषद लोणार, जि. बुलडाणा द्वारे संचालित नगर परिषद उर्दु प्राथमिक कन्या शाळा, लोणार, जि. बुलडाणा. | इमारत दुरूस्ती करणे. | ४ |
| १९. | नगर परिषद लोणार, जि. बुलडाणा द्वारे संचालित नगर परिषद उर्दु उच्च प्राथमिक शाळा, लोणार, जि. बुलडाणा. | स्वच्छता गृहाची दुरूस्ती करणे. | ३ |
| २०. | नगर परिषद मलकापूर, जि. बुलडाणा द्वारे संचालित राजाभाऊ बोंद्रे नगर परिषद उर्दु प्राथमिक शाळा क्र. २, पारपेट, मलकापूर, जि. बुलडाणा. | एल.ई.डी. टी.व्ही., सांऊंड सिस्टीम खरेदी करणे. | ५ |
| २१. | विदर्भ शिक्षण बहुउद्देशिय व अपंग कल्याण संस्था, देऊळघाट, ता.जि. बुलडाणा द्वारे संचालित इकरा उर्दु ज्युनिअर कॉलेज, देऊळघाट, ता. जि. बुलडाणा. | बेंचेस, डेस्क, टेबल खरेदी करणे. | २ |
| | **एकूण रूपये- ४२,००,०००/-** | | |

**"परिशिष्ट- ब"**

UTILIZATION CERTIFICATE

Certificate that an amount of -------------- drawn vide-----------Dated------ under Major Head २२३५A३४७-३१ towards Grant-in-Aid from------ ---Treasury was utilized for the purpose of " अल्पसंख्यांक शाळांना पायाभूत सुविधा पुरविणे " as mentioned in the sanction order purpose of ------------------- dated------of the District Collector,--------

Signature of District Collector.

## “परिशिष्ट- क”

उपयोगिता प्रमाणपत्र

मी/आम्ही श्री ........................................................................... आणि श्री.................................................................... असे प्रमाणित करतो की, महाराष्ट्र शासन, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई मार्फत अल्पसंख्याक खाजगी शाळा / कनिष्ठ महाविद्यालय / अपंग शाळा / नगरपरिषद / नगरपालिका/ महानगरपालिका शाळांस पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी अनुदान योजनेंतर्गत आमच्या.....................................................................................या संस्थेच्या .................................................................... या शाळेस /कनिष्ठ महाविद्यालयास / अपंग शाळा नगरपरिषद/नगरपालिका/ महानगरपालिका शाळा वर्ष २०२३ -२०२४ मध्ये मंजूर झालेल्या रु........................... ( अक्षरी रुपये.....................................................) एवढया अनुदानाचा उपयोग आम्ही खालील प्रयोजनांसाठी केला आहे आणि सदर अनुदान ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आले होते त्याच प्रयोजनांसाठी खर्च करण्यात आले आहे.

| अनु.क्र. | तपशील | खर्च (रु.) |
|---|---|---|
| १ | | |
| २ | | |
| ३ | | |
| ४ | | |
| ५ | | |
| | एकूण रु. | |

आम्ही असेही प्रमाणित करतो की, सदर खर्च विहित पध्दतीचा अवलंब करुनच करण्यात आला आहे.

| अ.क्र. | पदनाम | नाव | स्वाक्षरी |
|---|---|---|---|
| १ | अध्यक्ष | | |
| २ | सचिव | | |
| ३ | मुख्याध्यापक/प्राचार्य | | |
| ४ | मुख्याधिकारी/गट शिक्षणाधिकारी/ शिक्षण अधिकारी /शिक्षण निरिक्षक/ उपशिक्षणाधिकारी/ जिल्हा समाज कल्याण अधिकारी वर्ग-१/ सह संचालक, उच्च व तंत्र शिक्षण/ महानगरपालिका/समाजकल्याण अधिकारी/ शिक्का- | | |

पालक शिक्षण संघटना यांचे अध्यक्ष
शिक्का-

शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०२३/प्र.क्र.१२८/का-६, दि. ०५ मार्च, २०२४ सोबतचे सहपत्र